**ठाणे शहर हद्दीतील ठाणेनगर पो.स्टे. मध्ये गु.र.नं. । २०१/२०१६ या गुन्ह्याच्या संदर्भातील मा. विशेष न्यायालय, ठाणे येथील न्यायालयीन प्रकरणांमध्ये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री.शिशिर हिरे यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी ०४१६/प्र.क्र.९९/पोल-१०**

गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०८ सप्टेंबर, २०१७

**<u>संदर्भ :-</u>** शासन अधिसूचना, विधी व न्याय विभाग क्र. एसपीपी २०१७/यु.ओ.आर.१९/ डी-१४, दिनांक १७ मे, २०१७

**शासन निर्णय : -**

ठाणे शहर हद्दीतील ठाणेनगर पो.स्टे. मध्ये गु.र.नं. । २०१/२०१६ या गुन्ह्याच्या संदर्भातील मा. विशेष न्यायालय, ठाणे येथे, न्यायालयीन प्रकरणांमध्ये शासनाच्या वतीने कामकाज पहाण्यासाठी ॲड.श्री.शिशिर हिरे यांची विधी व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन दिनांक १७ मे, २०१७ च्या अधीसूचनेद्वारे विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी ॲड. श्री.शिशिर हिरे यांना खालीलप्रमाणे व्यावसायीक फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

अ) प्रतीदिन परिणामकारक सुनावणी फी रू. १०,०००/- (रूपये दहा हजार फक्त)

ब) प्रत्यक्षात केलेला प्रवास व निवास खर्च.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी. तसेच, प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्री.शिशिर हिरे यांना अपरिणामकारक सुनावणी फी व अन्य कोणतेही फी वा भत्ते अनुज्ञेय असणार नाही.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १७४/१७/व्यय-७, दिनांक १६.०६.२०१६ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०९०८१२५३३४८९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hussein Alimiya Mukadam

Digitally signed by Hussein Alimiya Mukadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6ec81cd542d1ef02798f37eb2f964c23fcdfbd8b40c5378f934679289bc26def, serialNumber=d1391c614871bb6e825b5f9341bd3ae559abf68b1b3e47c8c1d8d13329cdb465, cn=Hussein Alimiya Mukadam
Date: 2017.09.08 12:43:12 +05'30'

**( हुसेन अ मुकादम )**
कक्ष अधिकारी,गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. पोलीस आयुक्त, ठाणे.
२. महालेखापाल१- (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई .
३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
५. ॲड. श्री. शिशिर हिरे (पोलीस आयुक्त, ठाणे यांच्या कार्यालयामार्फत)
६. विधी व न्याय विभाग (का १४), मंत्रालय, मुंबई.
७. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती (पोल-१०).